

शीर्षक-  शोध संगीतकाराचा

लता मंगेशकर यांच्या गैरफिल्मी हिंदी गीतांचा शोध घेत असताना दिदींनी  १९५८ मध्ये आकाशवाणीवर गायलेल्या दोन रचना सापडल्या.जगभरात कार्यरत असलेल्या संगीताला समर्पित विविध गटातून या दोन्ही गाण्यांचे ध्वनिमुद्रण उपलब्ध झाले. दोन्ही पैकी एक गाणे ' बांध दिए क्यों प्राण प्राणोंसे ' हे यू ट्यूब वर उपलब्ध होते. कवीचे नाव समजले.परंतु 'सखी मैं जसे हुई विरानी' या दुसऱ्या गाण्याबद्दल काहीच माहिती सहजासहजी मिळेना. शोध घेत असताना आकाशवाणी तर्फे प्रकाशित होणाऱ्या सारंग पाक्षिकात या गाण्यांविषयी बरीच माहिती मिळाली.

सारंग वर्ष ३३,अंक १५,
दिनांक २२ जुलै १९५८
सुगम संगीत
सखी मैं जबसे हुई विरानी
रचयिता: विद्यावती 'कोकिल'
गायिका: लता मंगेशकर
संगीतकार: अली अकबर खान

सोबत पूर्ण कविता व स्वरलिपी दिली आहे.लता मंगेशकरांचा सुरांना लाभलेली उस्ताद अली अकबर खान साहेबांच्या सरोदची साथ असा अपूर्व योग या गाण्यात आहे. सदर गाणे ऐकण्यासाठी ही यूट्युब लिंक आहे.

https://youtu.be/mXDVW9ByHe0

दुसऱ्या 'बांध दिए क्यों प्राण प्राणों से' या गाण्याविषयी माहिती

सारंग, वर्ष २३, अंक ८
दिनांक ७ एप्रिल १९५८ या अंकात आहे.
रचयिता: श्री सुमित्रानंदन पंत
गायिका: लता मंगेशकर
संगीतकाराचा उल्लेख नाही

सोबत संपूर्ण कविता व स्वरलिपी दिली आहे.हे गाणे ऐकण्यासाठी यूट्युब लिंक आहे.
https://youtu.be/WeO7CttDAGU

दुर्दैवाने या गाण्याच्या संगीतकाराचा उल्लेख नाही. या गाण्याला लाभलेली सरोदची साथ ऐकताना हे गाणेसुद्धा उस्ताद अली अकबर खान यांनीच संगीतबद्ध केले असावे असे वाटले.या दोन्ही गैरफिल्मी गाण्यांविषयी लता मंगेशकर व उस्ताद अली अकबर खान उभयतांच्या चरित्रात काहीच उल्लेख नाही. ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध झाली होती किंवा नाही, काहीच समजले नाही. अलीकडेच उस्तादअलीअकबर खान यांच्या कन्या लाजो गुप्ता यांच्याशी संपर्क साधता आला. त्यांनी बांध दिए क्यों प्राण या गाण्याला त्यांच्या वडिलांचेच संगीत असल्याचे सांगितले. चौसष्ट वर्षांपूर्वीचे हे ध्वनिमुद्रण ज्या ज्ञात व अज्ञात संगीतप्रेमींनी जतन करून ठेवले त्यांना मनापासून धन्यवाद.
उस्ताद अली अकबर खान यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त या लता मंगेशकरांच्या काळाच्या ओघात काहीशा विस्मृतीत गेलेल्या रचना रसिकांना निश्चितच भावतील.

छायाचित्र - धर्मवीर पाल

डॉ. रवींद्र य. श्रीखंडे
doc_shrikhande@yahoo.com